# भारतीय पर्यावरण चळवळ

# मुंबईच्या वाहतुकीचे वास्तव

१९९३ ते ९६ मधील सर्वाधिक वाहतुकीच्या तासातील रस्त्यावरील चित्र

| वाहतुकीचे माध्यम | | व्यापलेली जागा % | प्रवासी वाहतुकीतील वाटा % |
|---|---|---|---|
| सार्वजनिक : | बेस्ट-बस | ४ | ६१ |
| निम सार्वजनिक : | टॅक्सी-रिक्षा | १२ | ३२ |
| खाजगी : | कार | ८४ | ७ |

सर्व सरकारी अहवालांनी रस्त्यावर बसला प्राधान्य देण्याची व मोटारीला आळा घालण्याची शिफारस केली होती. मात्र त्याविरूद्ध मोटारी वाढवणाऱ्या योजना राबवल्या गेल्या. त्याचवेळी बीकेसी आणि मिलच्या जमिनींचा विकास अशा शहरांची दाटी वाढवणाऱ्या चुकीच्या योजना केल्या गेल्या.

त्यामुळे वाहतुकीचे अराजक निर्माण झाले, शहर गॅस चेंबर बनले, सर्व दबाव रेल्वेवर आला, त्यामुळे एल्फिन्स्टनच्या चेंगराचेंगरीत ३२ बळी गेले. यामुळे रोज २५ ते ३० माणसे रस्ते व रेल्वे अपघातात बळी जातात. बसच्या संख्येत किमान तातडीने दुपटीने वाढ करणे जरूर आहे. ५५ उड्डाणपुल, नंतर ४२ उड्डाणपुल, वांद्रे-वरळी सागरी पुल, मेट्रो-मोनोरेल करावयाचे नव्हते. बस, रेल्वे, पादचारी, टॅक्सी-रिक्शा, सायकल यावर भर द्यायचा होता.

**द्वारा : ॲड. गिरीश वि. राऊत, निमंत्रक : भारतीय पर्यावरण चळवळ**

भ्र. ९८६९०२३१२७ (व्हॉटस् ॲप), ०२२-२४३७८९४८ • इमेल : advgirishvraut@gmail.com • वेबसाईड : www.indianenvironmentmovement.com